**आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील व्यसनमुक्ती प्रचार कार्य योजनेंअतंर्गत अस्थायी पदांना सन २०१५-१६ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सकआ-२०१५/प्रक्र ७९/आस्था-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२
दिनांक : ९ एप्रिल, २०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय, समाजकल्याण सां. कार्य व क्रि.वि. , क्र. सकआ -२०००/प्र.क्र. २८७/आस्था-२ , दिनांक २५/१/२००१

२) शासन निर्णय, सा.न्या.सां.का.क्री.व वि.स.विभाग,क्र. डीडीपी २००१/ प्र.क्र.४१४/सुधार १ दि. ५/१२/२००१

३) शासन निर्णय, सा.न्या.सां.का.क्री.व वि.स.विभाग,क्र. सकआ २००३/ प्र.क्र.७९/आस्था-२,दि. १५/१०/२००३

४) शासन निर्णय, सा.न्या. व वि.स.विभाग क्र. सकआ २०१४/ प्र.क्र.१४२/ आस्था-२, दि. २९/३/२०१४

**प्रस्तावना :**

आयुक्त, समाजकल्याण यांच्या आस्थापनेवरील व्यसनमुक्ती प्रचार कार्य योजनेंतर्गत संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये दारुबंदी प्रचारकार्य ऐवजी व्यसनमुक्ती कार्य असे नामाभिदान करण्यात येवून हा विषय जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये व्यसनमुक्ती प्रचार कार्य विभागाकडे असलेल्या नियमित वेतनश्रेणीतील १८५ पदांपैकी ५७ पदे रद्द करण्यात येवून समाजकल्याण संचालनालयाच्या स्तरावर योजनांचे संनियंत्रण ठेवण्यासाठी तसेच केंद्रीय अनुदान योजनेखालील प्रस्तावांची तपासणी/छाननी व शिफारशी विभागास सादर करावयाच्या कार्यवाहीसाठी नियमित वेतनश्रेणीमधील १८५ पदांपैकी ६ पदे (विवरणपत्र अ मधील ) पुढे चालू ठेवण्यास परवानगी देण्यात आली आहे. उर्वरित १२२ पदांवरील कर्मचारीवर्ग सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत असलेल्या महामंडळाच्या योजनेंतर्गत आवश्यक असलेल्या जास्तीच्या कर्मचारीवृंदाकरीता तसेच विभागांतर्गत इतर योजनांवरील मंजूर पदांकरीता वापरण्यास परवानगी देण्यात आली आहे. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये व्यसनमुक्ती व प्रचार कार्य शाखेतील दि. ३१.८.२००३ अखेरपर्यंत पुढे चालू ठेवण्यात आलेल्या २०१ पदांपैकी व संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयात नमूद करण्यात आलेली ६ पदे व अंशकालीन कर्मचाऱ्यांची ९९ अशा एकूण १०१ अस्थायी पदांना ३१.१२.२००३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येवून उर्वरित ९६ पदे रद्द करण्यात आली आहेत. तथापि या पदावर कार्यरत असणाऱ्या कर्मचारी/अधिकाऱ्यांना इतरत्र सामावून घेईपर्यंत त्यांचे वेतन व भत्ते अदा करणे शक्य व्हावे यास्तव एकूण ९६ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात आली आहे. सदर ९६ अधिसंख्य पदावरील अधिकारी/कर्मचारी जसजसे इतरत्र पदावर ज्या दिनांकापासून सामावून घेतले जाईल त्या दिनांकापासून तसतशी अधिसंख्य पदे आपोआप रद्द होतील. त्यानुसार शासन निर्णय, सा.न्या. व वि.स.विभाग, क्र. सकआ -२०१३/७०/प्र.क्र. ५४/आस्था - २, दिनांक १२ मार्च, २०१३ अन्वये व्यसनमुक्ती प्रचार कार्य योजनेंसाठी मंजूर असलेल्या ६१ अस्थायी पदांना दि .२८/२/२०१४ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आलेली होती. सन २०१३-१४ या वर्षात दि. २८/२/२०१४ पर्यंत मुदवाढ देण्यात आलेल्या ६१ पदांपैकी ३८ कर्मचाऱ्यांची पदे व्यपगत झालेली असल्याने, सदर ३८ पदे कमी करुन (६१-३८=२३) उर्वरित २३ अस्थायी पदांना संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये दि. १/३/२०१४ ते २८/२/२०१५ या कालावधीत मुदतवाढ देण्यात आली आहे. आता सदर २३ अस्थायी पदांची मुदत संपुष्टात आली असल्याने नियमित वेतनश्रेणीवरील ६ व अधिसंख्य निर्माण करावयाच्या १७ अशा एकूण २३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

आयुक्त, समाजकल्याण , पुणे यांच्या आस्थापनेवरील व्यसनमुक्ती प्रचार कार्य योजनेंतर्गत विवरणपत्र - अ मध्ये दर्शविलेली नियमित वेतनश्रेणीवरील ६ व विवरणपत्र - ब येथे दर्शविलेली अधिसंख्या निर्माण करावयाच्या १७ अशा एकूण २३ अस्थायी पदांना या **दिनांक १ मार्च, २०१५ पासून दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६** पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे :-

१) कार्यकारी पदे वगळून अन्य अस्थायी पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त नसल्याच्या धारणेच्या अधीन राहून सदर मुदतवाढ देण्यात येत आहे.

२) अस्थायी पदे ज्या कारणास्तव, ज्या अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्यांचे पालन करण्यात यावे.

३) अधिसंख्य पदावरील अधिकारी/कर्मचारी जसजसे इतरत्र पदावर ज्या दिनांकापासून सामावून घेतले जाईल त्या दिनांकापासून तसतशी अधिसंख्य पदे आपोआप रद्द होतील.

२. उपराक्त पदांसाठी होणारा खर्च,

(१) २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण.
०२ - समाज कल्याण
१०५ - दारुबंदी महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम
१९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान
(०३)(०१) - दारुबंदी प्रचार कार्य (२२३५-२८०-४) **मागणी क्र.एन-४**

(२) २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण
०२ - समाज कल्याण
१०५ - दारुबंदी
(१)(एक) दारुबंदी प्रचार कार्य
**मागणी क्र.एन-४ (२२३५-०१०-४)**

या लेखाशिर्षाखालील सन २०१५-१६ या वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व हा खर्च त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभागच्या शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.४ ऑक्टोंबर,२००४ अन्वये प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०९१२०५३०५०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap P Lubal

Digitally signed by Pratap P Lubal
DN: CN = Pratap P Lubal, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.09 12:19:31 +05'30'

**सोबत :विवरणपत्र अ व ब**

**(प्र.पां.लुबाळ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,
आयुक्त, समाज कल्याण, पुणे
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.
सर्व प्रदेशिक उपायुक्त,
सर्व सहाय्यक आयुक्त,
सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपुर
अधिदान व लेखा अधिकारी,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकार
वित्त विभाग, व्यय - १४/ अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
कक्ष अधिकारी, ( मावक / अर्थसंकल्प ) सा.न्या.व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
निवडनस्ती आस्था-२ कार्यासन

शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : सकआ-२०१५/प्रक्र ७९/आस्था-२
दि. ९/४/२०१५ सोबतचे विवरणपत्र.

विवरणपत्र - अ .

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक आयुक्त | ९३००-३४८०० ग्रेड पे ४६०० | १ | मुख्यालयस्तर |
| २ | उच्चश्रेणी लघुलेखक | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० | १ | मुख्यालयस्तर |
| ३ | व्यसनमुक्ती प्रचार कार्य अधिकारी | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० | १ | मुख्यालयस्तर |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | १ | मुख्यालयस्तर |
| ५ | वाहन चालक | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | १ | मुख्यालयस्तर |
| ६ | शिपाई | ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | १ | मुख्यालयस्तर |
| | एकुण - | | ६ | |

विवरणपत्र - ब
(अधिसंख्या निर्माण करावयाची पदे)

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या | जिल्हा |
|---|---|---|---|---|
| १ | प्रक्षेपक | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | ३ | लातुर, पुणे, नागपुर |
| २ | वाहन चालक | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | २ | ठाणे, यवतमाळ |
| ३ | अंशकालीन सफाईगार (रु.१५०/-) अंशकालीन संघटक (रु. १३०/-) | एकत्रित मानधनावर | १२ | (प्रत्येकी २ प्रमाणे) कोल्हापूर, बीड, परभणी, रायगड, गडचिरोली, औरंगाबाद |
| | एकुण - | | १७ | |
| | विवरणपत्र "अ" + "ब" = | | २३ | |

एकुण :- अ + ब = ६ + १७ = २३

( प्र. पां. लुबाळ )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन